**<u>कोषागारातून रोख देय अनुदान</u>**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी सर्वसाधारण घटकासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत. (२२१५ ९७९१)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/प्र.क्र.७५/पापु-१०

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केटजवळ, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: ०४ ऑक्टोबर, २०१८

**<u>वाचा :</u>**

१) **शासन निर्णय क्रमांकः** पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-७, दिनांक १७ मार्च, २०१०.

२) **केंद्र शासनाचे पत्र क्र.**W-११०२०/१९७/२०१५-Water-I/**१५०, दिनांक १५ मार्च, २०१८**

**<u>प्रस्तावना :</u>**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण घटकासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाकडून उपरोक्त वाचा येथील २) अन्वये प्राप्त झालेला निधी राज्याच्या एकत्रित निधीत आर्थिक वर्षाच्या अखेरीस दिनांक २२ मार्च, २०१७ रोजी जमा झाल्याचे वित्त विभागाने अभिप्राय दिले आहेत. सदरचा निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या अखेरीस प्राप्त झाल्याने सदर निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात अखर्चित होता. सदर निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र हिश्याचे लेखाशीर्ष २२१५ ९७९१ याखाली सहाय्यीकृत बाबी (Support) या घटकासाठी रू. २.६२४५ कोटी तसेच पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकांसाठी रू. २. ६२४५ कोटी असा एकूण रू. ५.२४९ कोटी (रूपये पाच कोटी, चोवीस लक्ष, नव्वद हजार फक्त) एवढा निधी आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BEAMS) सोबतच्या विवरणपत्रानुसार मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

०२. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सहाय्यीकृत बाबी (Support) या घटकासाठीचा रू. २.६२४५ कोटी तसेच पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकांसाठीचा रू. २. ६२४५ कोटी असा एकूण रू. ५.२४९ कोटी (रूपये पाच कोटी, चोवीस लक्ष, नव्वद हजार फक्त ) एवढा निधी आहरण व संवितरण अधिकारी (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रू. ५.२४९ कोटी (रूपये पाच कोटी, चोवीस लक्ष, नव्वद हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या

कार्यालयातून आहरीत करण्यासाठी (श्री. पां. रा. खोटरे), आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम (श्री. पां. रा. खोटरे) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करुन ती पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी व तद्नंतर स्वतंत्र धनादेशाद्वारे रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर रक्कम केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार तसेच राज्य शासनाने या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावी.

०३. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर रक्कम बिनशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल २०१८ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील अनुक्रमांक ७ ते ८ मधील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटींची पुर्तता होत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक१५१/व्यय-३, दिनांक ११.०५.२०१८ च्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००४१२५४३०६५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: CN = Vasant Bhimrao Mane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.10.04 12:59:25 +05'30'

**(वसंत भि. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल -१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र.
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) नागपूर, महाराष्ट्र.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
५. मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,बेलापूर ,नवी मुंबई.
७. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, (१४४३-कार्यासन ), मंत्रालय,मुंबई
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय -३ ), मंत्रालय,मुंबई.
९. कक्ष अधिकारी (पापु-०४ ), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग मंत्रालय,मुंबई.
१०.निवड नस्ती ( पापु-१०).

## विवरणपत्र अ

| | | | |
|---|---|---|---|
| पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र. राग्रापे २०१८ /प्र.क्र. ७५/पापु-१०, दिनांक : ०४ ऑक्टोबर, २०१८ | | | |
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण सहाय्यीकृत बाबी आणि पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (केंद्र हिस्सा) (लेखाशीर्ष २२१५ ९७९१) (रूपये कोटीत) | | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | घटक | एकूण वितरीत रक्कम |
| | संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई | सहाय्यीकृत बाबी | २.६२४५ |
| | | पाणी गुणवत्ता सर्वेक्षण व संनियंत्रण | २.६२४५ |
| एकूण | | | ५.२४९ |
| रू. ५.२४९ कोटी (रूपये पाच कोटी, चोवीस लक्ष, नव्वद हजार फक्त ) | | | |

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: CN = Vasant Bhimrao Mane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.10.04 13:08:39 +05'30'

**(वसंत भि. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**